माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर,२०१९ मधील "क्यार" व "महा" चक्रीवादळामुळे आलेल्या अवेळी पावसामुळे कोकण विभागात मत्स्यव्यवसायिकांचे नुकसानीसाठी मदत निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.१७२/म-३
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख:- १० जुलै, २०२०

संदर्भ: १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/ प्र.क्र.४०/ म-३, दिनांक १३/०५/२०१५
२) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग यांचे क्रमांक-मशा/कार्या६/नै. आ./कावि-६२५५/म-३/२०२०, दिनांक १५/०२/२०२० चे पत्र.

प्रस्तावना :

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर,२०१९ मधील **"क्यार"** व **"महा"** चक्रीवादळामुळे आलेल्या अवेळी पावसामुळे कोकण विभागात मत्स्यव्यवसायिकांचे नुकसान झाल्याचे दिसून आले. चक्रीवादळामुळे आलेल्या अवेळीपावसामुळे नुकसान झालेल्या मत्स्यव्यावसायिकांना मदत देण्याबाबत मा. मंत्री, मदत व पुनर्वसन यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळच्या उपसमितीने दिनांक १३/०३/२०२० रोजीच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१५/प्र. क्र.४०/ म-३, दिनांक १३/०५/२०१५ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) दरानुसार व निकषानुसार मदत देण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

२. दिनांक १३/०५/२०१५ रोजीच्या शासन निर्णयामधील अनुक्रमांक ७ "मत्स्य व्यवसाय" मध्ये मत्स्य व्यवसायिकांना बोटींची दुरुस्ती, जाळी यासाठी मदत, मत्स्यबीज शेतीसाठी निविष्ठा इत्याची बाबींकरीता आर्थिक मदत देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, कोंकण विभाग यांनी रूपये ३५१.०० लक्ष (रूपये तीन कोटी एकावण्ण लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याची मागणी केलेली असून सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर,२०१९ मधील क्यार व महा चक्रीवादळामुळे आलेल्या अवेळी पावसामुळे कोकण विभागातील रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या जिल्ह्यांतील मत्स्यव्यावसायिकांच्या बोटी, जाळी, मत्स्यबीज शेतीचे नुकसान झाल्यामुळे राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) नुसार मदत अनुज्ञेय करून एकूण मदत देण्यास प्राप्त झालेल्या शासन मान्यतेनुसार, विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी मागणी केलेला निधी पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | नियत्रक अधिकारी | जिल्हा | लेखाशीर्ष व मदत वाटप रक्कम (रक्कम रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| | | | मागणी क्र. सी-६<br>२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणाठी सहाय्य,०२ पूर, चक्रीवादळे इत्यादी,<br>१०१ अनुग्रह सहाय्य,<br>११८-हानी पोहोचलेल्या होड्या व मासेमारी साधनसामग्री यांची दुरूस्ती/ती नव्याने पुरविणे यासाठी सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) हानी पोहोचलेल्या होड्या व मासेमारी साधनसामग्री यांची दुरूस्ती/ती नव्याने पुरविणे तसेच मासे बियाणे यासाठी सहाय्य (अनिवार्य)<br>३१, सहायक अनदाने (वेतनेतर)<br>(२२४५ ०३२४) |
| १ | विभागीय आयुक्त, कोंकण | रायगड | ३०.०० |
| | | रत्नागिरी | ६०.०० |
| | | सिंधुदुर्ग | २६१.०० |
| एकूण कोंकण विभाग | | | ३५१.०० |

२. प्रस्तुत निधी वितरीत करतांना दिनांक १३/०५/२०१५ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती तसेच निकषांची खात्री करून पूर्तता करण्यात यावी.तसेच मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) याबावत पूर्ण करण्यात पंचनाम्यानुसार विभागीय आयुक्ता यांनी दिलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांना करावे.
ii) संबंधित मत्स्यव्यवसाय बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.
iii) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.
iV) मत्स्यव्यवसाय नुकसानीबाबतची मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये.

३. वरील विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार निधी जिल्ह्यांना विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी (म-११) यांनी सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

४. सदर निधी प्राप्त झाल्याबरोबर संबंधित बाधितांना तात्काळ वितरीत करण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. झालेल्या खर्चाची महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपक्षा जास्त खर्च होणार नाही याची

दक्षता घेण्यात यावी. वितरीत अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१११११४६०२०२१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(उदय ग. गवस)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त),मंत्रालय,मुंबई,
५. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग
६. जिल्हाधिकारी, रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
९. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )